# भाग १

७७ शुक्रवार पेठ, सातारा ह्या कोल्हटकरांच्या सातारा गावातील ख्यातनाम घराचा आणि कुटुंबाचा गेल्या सुमारे वीस वर्षात कसा ह्रास झाला ह्याची ही दु:खद कहाणी आहे. ह्या ह्रासाला मी स्वत: पहिल्याप्रथम पूर्णपणे जबाबदार आहे कारण योग्य वेळी आवश्यक तितका व्यावहारिकपणा मी दाखविला नाही. गेल्या शंभर-दीडशे वर्षांपासूनचा आमचा जो इतिहास मला ठाऊक होता त्यामध्ये एकोप्याने आणि प्रामाणिकपणे राहण्याचीच उदाहरणे आमच्या समोर होती आणि पुढचे दिवसहि तसेच जातील अशी आमची भोळसट खात्री होती. आमच्या ह्या विश्वासाला आता तडा गेलेला आहे. चालू पिढीतील घरातील सर्वात ज्येष्ठ ह्या नात्याने घराचे अस्तित्व आणि प्रतिष्ठा टिकविण्याची जी जबाबदारी माझ्यावर नैसर्गिकरीत्या होती ती मी पार पाडली नाही. वडिलार्जित मालमत्ता हा व्यक्तीकडे आलेल्या ठेव्यासारखा असतो. त्या ठेव्यामध्ये त्याने यथाशक्ति भर घालून तो पुढील पिढीच्या स्वाधीन करावा ह्या तत्त्वावर प्रतिष्ठित घरे चालतात पिढी दर पिढी चालत राहतात. आमच्या बाबतीत तसे आता घडणार नाही आणि हे माझ्या नेतृत्वाखाली घडले हे मला लांच्छनास्पद आहे. ह्या घरात राहून गेलेले आमचे आईवडील, आजीआजोबा आणि पूर्वीच्या पिढ्या, तसेच येथे राहून गेलेले अच्युतराव, चिन्तामणराव, बाळकाका अशांच्या समोर माझे लांच्छन मला अतिशय दु:ख देते. त्यांची स्मृति जिवन्त ठेवणारी ही वास्तु माझ्या हलगर्जीपणामुळे नष्ट झाली हे मी विसरू शकत नाही.

माझ्याइतकीच ह्या ह्रासाची जबाबदारी आमचा सर्वात धाकटा भाऊ संजय (बाबा) ह्याच्यावरहि पडते. त्याने कट केल्यासारखे वर्तन करून अन्य सर्व भावाबहिणींचा पूर्ण विश्वासघात केला. आपल्या कृत्यांना त्याने पद्धतशीरपणे इतरांपासून लपविले.

ती उघडकीला आल्यावर त्याला सावरण्यासाठी आम्ही वेळोवेळी केलेली सर्व आर्थिक मदत त्याने पाण्यात घालवली. इतकेच नाही तर आम्ही अशी काही मदत केली होती ह्याचा कसलाहि पुरावा आमच्याकडे नाही अशाहि वल्गना तो हल्ली करत असतो.  आपल्या करण्यात काही चूक आहे असे त्याला वाटत असल्याचे काहीहि दर्शक त्याच्याकडून येत नाही.

वस्तुस्थिति अगदी विरुद्ध आहे.  साधारण १९९६-९७ सालापासून आम्ही भावंडांनी मिळून बाबाला काय आणि किती मदत केली ह्याचा त्या त्या वेळचा कागदावर आणि कायदेशीर असा लिहून ठेवलेला पुरावा माझ्यापाशी आहे आणि तो आता मी ह्या पुढच्या भागामध्ये क्रमाक्रमाने दाखविणार आहे.



*'महाराष्ट्रमित्र', ७७, शुक्रवार पेठ, सातारा*

त्यापूर्वी हे लिहितो की आम्ही लहानपणी शाळेत असतांना आमचे मध्यमवर्गी घर कसे होते?  आमचे आजोबा तात्या (हरि गणेश) हे कुटुंबप्रमुख, कर्ते नाना आणि इन्नी (नारायण हरि आणि कुमुदिनी) हे आईवडील आणि आम्ही त्यांची शाळकरी मुले येथे आनंदाने रहात होतो.  १९४८ साली जळितामध्ये आमचेहि घर आणि छापखाना आगीत जळाले पण त्या विपत्तीतून आम्ही बाहेर पडलो.  १९४९ साली घरामध्ये वीज आली.  तेव्हापासून कॉलेजशिक्षणासाठी १९५८ साली मी बाहेर पडेपर्यंतच्या ८-१० वर्षांचा चित्रपट माझ्या डोळयासमोर उभा राहतो.  आम्ही फार पैसेवाले नव्हतो. तसेहि युद्धोत्तर वातावरण टंचाईचेच होते.  पुष्कळदा शाळेत जातांना माझ्या आणि अन्य भावाबहिणींच्या पायात चप्पला नसत.  चांगल्या ठेवणीतल्या कपड्यांची कल्पना आम्हांस नव्हती.  दोन अर्ध्या चड्ड्या आणि दोन अर्धे शर्ट, एक

दांडीवर आणि एक धुवायला एव्हढी आमची एकूण श्रीमन्ती असे. खाण्यापिण्याच्या वस्तु बाजारात नव्हत्या आणि असत्या तरी त्या आणून मोठ्या कुटुंबाला पुरविण्याइतके पैसे व्यवसायातून सुटत नव्हते. तरीहि आम्ही आनंदी होतो. आसपास आमच्याच वयाचे मित्र भरपूर होते. दिवाळी-मे महिन्याची सुटी घराबाहेर हुंदडत कधी संपून जाई ते कळत नसे. घरच्याच म्हशीचे दूध-तूप वापरून इन्नी जे काय शिजवीत असे ते आमचे खाणे होते. आमची मेजवानीची कल्पना शनिवारी सायंकाळी कांद्याची आमटी, रविवारी पोळया, वर्षातून एक दोनदा श्रीखंड, मे महिन्यात दोनतीनदा आमरस, एरवी सणानुसार काही गोड आणि मधूनमधून कांदे पोहे, साबुदाण्याची खिचडी, थालिपीठ, कांद्याची भजी इतपत माफक मर्यादेत होती. भाजी आणण्यापासून पाणी भरण्यापर्यंत घरातील किरकोळ कामे आम्ही मुले करीत असू. आमच्या घराच्या अर्ध्या भागात आमचा ’महाराष्ट्रमित्र’ छापखाना होता. माझे पणजोबा १८६७ ते १८९७ ह्या काळात तेथे ’महाराष्ट्रमित्र’ नावाचे साप्ताहिक छापत असत आणि तोच त्यांचा व्यवसाय होता. छापखान्यातील अधिकचे फोल्डिंग, जुपणी, नंबरिंग, प्रुफे तपासणे, प्रुफे घेऊन गिऱ्हाइकांकडे जाणे, बॅंकेत जाणे अशी वरकड कामे आम्ही उरकून टाकत असू. छापखाना बंद असेल अशा रविवार वा सुटीच्या दिवशी तेथीलच ’कोटेशन्स’ वापरून घरे बांधणे हा आमचा छंद होता. अशा साध्यासुध्या गोष्टींनी आमचे मन रमायचे. महागडी खेळणी ना आम्ही कधी मागितली, ना आमच्या पालकांकडे असले महागडे सोस पुरवायला पैसे होते.

खरी मजा यायची मे महिन्याच्या सुटीत तात्यांच्या सर्व लेकी-जावई, अण्णा-काकी, बाळकाका-काकू आपापल्या मुलांसह आठदहा दिवस साताऱ्यास येत तेव्हा येई. २५ ते ३० जण घरामध्ये गोळा होत. सकाळी बहिरोबा, संध्याकाळी चार भिंती, एकदा परळी, एकदा यवतेश्वर-अजिमतारा अशा सहली निघत. दारातल्या

आंब्याच्या विशाल वृक्षावर चमेलीचा वेल वरपर्यंत गेला होता.  रात्रीत त्याची खाली पडलेली फुले गोळा करणे, नंतर झाडावर चढून उरलेली फुले उतरविणे, आंब्याच्या दिवसात आंब्याच्या कैऱ्या, पाड गोळा करणे, परसातील जांभळाची जांभळे वेचणे आणि झाडावर चढून तोडणे (ह्या जांभळाच्या झाडावरून मी एकदा पार रस्त्यावर पडलो आणि माझी शुद्ध हरपली.  डॉ.जोगांनी येऊन मला पूर्ण तपासून मला विशेष काही दुखापत झालेली नाही असे सांगेपर्यंतचा इन्नीचा ओढलेला चेहरा मला आठवतो) असले उद्योग आम्ही करीत असू.  बाळूदादा-सुभाष-प्रभाकर-प्रमोद-शशी-दिलीप-ताई-अंजू-रमेश गोडबोले आणि ते तीन भाऊ असे आम्ही कोटेश्वराच्या देवळात शिवाशिवी वा घरात पत्ते खेळण्यात आमची सुटी घालवत असू. अशा असंख्य आठवणी आहेत.  सर्वात आठवणारी आठवण म्हणजे तात्यांचे अश्रू. सुटीच्या अखेरीस त्यांची एकेक मुलगी आपल्या मुलांबाळांसह परत निघाली की तात्या अंगणात निरोपाला यायचे आणि त्यांनी कितीहि प्रयत्न केला तरी त्यांचे अश्रू त्यांना लपविता येते नसत!  मी आणि भाऊची मुंज साताऱ्यात १९५२च्या मार्च महिन्यात झाली.  त्यावेळी तात्यांच्या सर्व मुली, जावई, मुले-सुना, नातू-नाती उपस्थित होत्या.  त्यावेळचे समाधानी मध्यमवर्गी कुटुंबाचे हे चित्र पहा.



असो. आठवणी बऱ्याच झाल्या. आता पुढच्या शोककथेकडे वळतो. ही कथा मुख्यत्वेकरून १९९५ ते २००१ ह्या काळातील आहे. त्यात घातलेले रुपयांचे आकडे हे त्या त्या वेळी प्रत्यक्ष दिल्या-घेतलेल्या रकमांचे आहेत. आजच्या आकड्यांकडे तुलनेसाठी पाहिले तर जुन्या आकड्यांची नीट कल्पना येणार नाही म्हणून काही मार्गदर्शक दाखवितो. भारताचा Wholesale Price Index १९९५ साली ४६.३५ आणि २०१० मध्ये १०० होता. आज २०१६ मध्ये तो १२६.४७ इतका झाला आहे. (http://www.indexmundi.com/facts/india/wholesale-price-index). १ औंस (२८.३५ ग्रॅम) सोने १९९५ मध्ये रु. रु. १५,००० च्या आसपास होते तेच आज रु. ८०,००० ते ९०,००० च्या दरम्यान आहे. (http://goldprice.org/gold-price-india.html ) अमेरिकन डॉलर आणि भारतीय रुपया विनिमय दर १९९४-९५ साली १ डॉलर = रु. ३१.४० इतका होता तो आज ६७.७४ इतका आहे.

ह्या शोककथेचे प्रमुख दोन बळी मला दिसत आहेत. एक म्हणजे आमची वहिनी अभया. भाऊच्या अकाली निधनानंतर ती एकाकी पडली आहे आणि पुण्यात भाड्याच्या जागेत रहात आहे. तिकडे बाबा आपल्या ह्या वहिनीचा हक्क लुबाडून वडिलार्जित घर पाडून त्याचे तुकडे मोडून खात चैनीत रहात आहे. दुसरा बळी म्हणजे बाबाचाच मुलगा वेदांग. छापखाना चालू राहिला असता तर छापखान्याचा मालक म्हणून १०-१५ कुटुंबांना पोसून तो ताठ मानेने उभा राहिला असता. पण १५० वर्षांचा उभा छापखाना त्याच्या वडिलांनी ८-१० वर्षांमध्ये आडवा केल्यामुळे वेदांगला तो वारसा मिळणार नाही. परिणामत: त्याच्यावर आज दुसऱ्याकडे नोकरी मागण्याची वेळ आली आहे.

भाग २.

१) सातारा गावातील आमचे कुटुंबाचे पणजोबा गणेश नारायण ह्यांच्या मूळ खरेदीचे आणि १८६७ सालापासून आमच्या कुटुंबाचा अविभाज्य भाग असलेले ७७ शुक्रवार येथील घर आमचाच सर्वात धाकटा भाऊ संजय ऊर्फ बाबा ह्याने आम्हाला हातोहात फसवून आमच्या हातून कसे आमच्या नकळत काढून घेतले त्याची ही कहाणी आहे. ह्या गोष्टी आणि संबंधित कागदपत्र कोठेतरी उपलब्ध असावेत ह्या हेतूने मी हे टिपण करीत आहे. अन्यथा आमच्या पिढीनंतर हे माहीत असलेला कोणीच उरणार नाही आणि घराशी असलेला आमचा संबंध स्मृतीतूनहि नष्ट होईल.

२) हे मी लिहून ठेवत आहे ह्याचा अर्थ असा नाही की मला त्या घराचा काही भाग माझ्या मालकीचा म्हणून मिळावा अशी माझी काही इच्छा होती किंवा आहे. कॉलेजशिक्षणासाठी वयाच्या सोळाव्या वर्षी १९५८ साली मी सातारा सोडले आणि पुण्यामध्ये फर्ग्युसन कॉलेजात दाखल झालो आणि अनाथ विद्यार्थिगृहाच्या वसतिगृहामध्ये राहू लागलो. ती संस्था आणि विद्यार्थी सहायक समिती, तसेच काही शिकवण्या ह्यांच्या मदतीने मी १९६५ साली गणित विषयात एम.ए. पदवी मिळवली. लगोलग कॉलेजनेच मला व्याख्यात्याची नोकरी दिली. एक वर्ष ती नोकरी करून १९६६ साली यूपीएससी परीक्षेमधून मी आयकर विभागात ITO Class I म्हणून दाखल झालो. सेवेच्या अखेरीपर्यंत माझी Commissioner of Income Tax ह्या स्थानापर्यंत प्रगति झालेली होती. सेवेच्या काळात मी पुणे, ठाणे, दिल्ली, आंध्रातील अनंतपूर, कलकत्ता आणि अखेर मुंबई अशा जागा पाहिल्या. मुंबई स्टॉक एक्स्चेंजचा Executive Director ह्या स्थानावर शेवटची तीन वर्षे मी होतो. माझी सरकारी नोकरी संपल्यानंतर मी प्रथम माझ्या पुण्यामध्ये

बांधलेल्या स्वत:च्या घरामध्ये राहात होतो. तेथून २००२ साली मी आणि माझी पत्नी अरुंधती कॅनडामध्ये कायमचे रहिवासी म्हणून आलो. २००५मध्ये आम्ही कॅनडाचे नागरिकत्व घेतले आणि माझ्या उर्वरित आयुष्यात मी कधी कायम वास्तव्यासाठी भारतात परत जाईन अशी कोणतीच शक्यता मला दिसत नाही. आत्तापर्यंतच्या माझ्या आयुष्यात आपली कायम राहण्याची जागा अशा दृष्टीने साताऱ्याकडे कधीहि पाहिलेले नाही. तरीहि सातारच्या घराशी मी आणि माझ्या भाऊबहिणी ह्यांचे भावनिक नाते जुळलेले आहे आणि ते तसेच राहणार. आम्ही त्या घरामध्ये वाढलो आणि आमचे आईवडील ह्या जगात होते तोपर्यंत वेळोवेळी तेथे येत जात राहिलो. घरातली माणसे, परिसरातली माणसे, घरातल्या वस्तु, येणारे जाणारे पाहुणे, आमची शाळा, घरातीलच छापखाना आणि गजानन व्यायाम मंडळाची तालीम अशा असंख्य आठवणी आमच्या मनात जाग्या आहेत आणि त्यामुळे आम्ही आमच्या उत्तरायुष्यामध्ये तेथे राहण्यासाठी परत जाऊ अशी शक्यता उरलेली नसतांनाहि घराशी आणि त्या जागेशी आमचे भावनिक नाते टिकून असावे हे साहजिक आहे. माझी खात्री आहे की माझ्या अन्य भावाबहिणींच्याहि भावना ह्याच आहेत, जरी ते सर्वजण आज सुस्थितीमध्ये असून घराच्या वाटयावर डोळा ठेवून बसावे ह्याची कोणासहि आवश्यकता नाही. तरीहि आपल्या हक्काचे घर कोणीतरी परस्पर पळवले आणि आपल्या तोंडाला पाने पुसली ह्याचे अत्यंत वैषम्य आहेच. हे वैषम्य अधिकच क्लेशकारक आहे ह्याचे कारण असे करणारा दुसरा तिसरा कोणी नसून आमचाच सर्वात धाकटा भाऊ निघाला - तेहि त्या भावाला वेळोवेळी आर्थिक आणि अन्य साहाय्य देऊन त्याच्या स्वनिर्मित मूर्खपणातून आम्ही सर्वांनी वेळीच हात देऊन त्याला बाहेर काढलेले असतांना. हे वैषम्य अधिकच क्लेशकारक आहे ते अशासाठीहि की आजतागायत ह्या आमच्या कृतघ्न भावाने मिळालेल्या मदतीबद्दल एकहि पोच - acknowledgement - फुकाच्या शब्दानेहि दिलेली नाही, आमची अर्थिक मदत परत करण्याचे तर नावच काढलेले नाही.

३) माझ्या आतापर्यंतच्या सर्व यशस्वी आयुष्यात माझी पत्नी अरुंधती (अरुणा) हिचा फार मोठा वाटा आहे. आमचा आन्तरजातीय विवाह त्या वेळी कुटुंबात वादाचा विषय झाला होता आणि आईवडील, काकाकाकू इत्यादींच्या विरोधापुढे आम्ही आमचे लग्न Civil Marriages Act खाली नोंदवून केले. मात्र लग्न पार पडताच पुन: संपूर्ण सौहार्दाचे वातावरण निर्माण झाले. सर्वांकडून अरुणास अतिशय प्रेमाची वागणूक नेहमीच मिळत आलेली आहे. माझी आई इन्नी ही अरुणावर इतकी प्रसन्न होती की आदर्श घर कसे चालवावे ह्या बाबतीत ती तिचे उदाहरण अन्य तरुण मुलींना देत असे असे मला सांगण्यात आलेले आहे.

४) आमच्या घराचा अलीकडच्या काळातील क्लेशदायक इतिहास माझ्या समाधानासाठी मी कोठेतरी नोंदवावा असे वाटल्यावरून आणि त्यासाठी अधिक उशीर होण्यापूर्वीच हे लेखन मी करत आहे. ह्यात उल्लेखिलेल्या सर्व घटनांच्या सत्यतेसाठी लागणारे कागदी पुरावे माझ्यापाशी असून ते पुढे जागोजागी मी दाखविणार आहे.

५) ह्या सर्व दु:खद घटनाक्रमाला प्रारंभ सप्टेंबर १९८६ मध्ये होतो. त्या काळापर्यंत माझा क्र. २ चा भाऊ अच्युत, ज्याला आम्ही भाऊ असे म्हणत होतो, ह्याची वनखात्यातील नोकरी अडचणीत आलेली होती. त्या गोष्टीच्या अप्रिय कारणांमध्ये येथे जात नाही कारण तो आता ह्या जगात नाही आणि सध्याच्या लिखाणाचा तो विषय नाही. आमचे सातारचे घर आणि तेथील महाराष्ट्रमित्र हा वडिलोपार्जित छापखाना हा आमचे वडील नारायण हरि (नाना) आणि आम्ही तीन भाऊ ह्यांच्या समाईक मालकीचा होता, यद्यपि धाकटा भाऊ संजय हाच तो सर्व व्यवसाय पाहात होता आणि त्याचे उत्पन्नहि घेत होता. ह्याबद्दल आमची काहीच तक्रार कधीच नव्हती कारण बाकीचे दोन्ही भाऊ आपापल्या नोकरीच्या जागी

राहून आपले आयुष्य चालवीत होती. ह्यामध्ये कधीकाळी काही बदल होऊ शकेल अशी अपेक्षाहि नव्हती कारण आम्ही दोनहि थोरल्या भावांनी स्वखुशीने सातारा सोडून आपापले स्वतन्त्र मार्ग चोखाळले होते. घराशी आणि तेथील माणसांशी आपला भावनिक धागा टिकून असावा इतकीच आमची अपेक्षा होती.

६) १९८६ सालापर्यंत आपल्या सरकारी नोकरीतील काही प्रकरणामध्ये भाऊ असा अडकला होता की त्याला मदतीचा हात देऊन बाहेर काढण्याची आवश्यकता दिसू लागली होती. त्यासाठी सप्टेंबर १९८६ मध्ये आम्ही सर्व जण चर्चेसाठी साताऱ्यात जमलो. कायदा आणि रूढीनुसार भाऊचाहि घरावर आणि व्यवसायावर अधिकार होता. मी अशी सूचना केली की घर समाईक होते ते तसेच ठेऊन छापखान्याचे रूपान्तर भागीदारीमध्ये करावे आणि नाना, भाऊ आणि बाबा हे भागीदार असावेत. भाऊने साताऱ्यात राहण्यास यावे आणि भाऊ व्यवसायाची तान्त्रिक बाजू आणि बाबा त्याची व्यावहारिक बाजू सांभाळतील.

७) नानांना ही कल्पना फारशी पटली नव्हती असे वाटते पण त्याहिपेक्षा अधिक कळीचा मुद्दा बाबाला हे कितपत रुचेल ह्याचा होता. त्यापूर्वीची १५-२० वर्षे हा व्यवसाय स्वतंत्र म्हणून चालविल्यानंतर ह्यापुढे भावाची भागीदारी त्याला मान्य होणे शक्यच नव्हते त्यामुळे बाबाने प्रस्तावाला कडाडून विरोध केला. चर्चा चालू असतांनाच रागाने लालबुंद होऊन भाऊ आणि मी एकत्र राहण्यापेक्षा मीच हे सर्व सोडून जात्तो, भाऊ किंवा मी, आम्हा दोघांपैकी एकजणच येथे राहील असे निर्वाणीचे बोलत खोलीतून बाहेर पडला. अखेरीस घराचे बांधकाम आणि छापखाना ह्यांची किंमत रु. २,८०,००० ठरून रु. ७५,००० प्रत्येकी घेऊन मी आणि भाऊने घराचे बांधकाम आणि छापखाना ह्यावरील हक्क सोडावा असे ठरले. त्याप्रमाणे झालेला ठराव नोंदवून ४ जानेवारी १९८८ ह्या दिवशी नाना आणि

आम्ही तिघांनी स्टॅंपपेपरवर सह्या केल्या. तो करार ह्यालगत जोडला आहे(A). य़ेथे मी पुन: स्पष्ट करतो की ह्या करारामध्ये केवळ घराच्या ४००० चौरस फूट जागेवरील बांधकामाचाच उल्लेख पान २ क्र. १५ येथे दिसतो, घराच्या जागेचा नाही. राहत्या घराची किंमत रु. १,००,००० दर्शविली असून बाकीची रक्कम छापखान्याची यन्त्रे, सामुग्री, घरातील सोने इत्यादींची आहे. जागेची कोणतीच किंमत येथे दाखविलेली नाही. ह्या किंमती नोंदवण्याच्या वेळेस कसलाच वाद वा मतभेद झाले नाहीत. बाबाने घातलेल्या सर्व किंमती सर्वांनी मान्य केल्या आणि सर्व काम सामंजस्याने झाले. बाबाने भाऊकडे अल्लापल्लीस त्याचा वाटा आणि माझ्याकडे मुंबईस माझा असे हस्त्याहस्त्याने पोहोचविले.

८) आमच्या नकळत बाबाचेहि पाय घसरणीस लागायला ह्यानंतर लवकरच प्रारंभ झाला असा माझा अंदाज आहे. जुन्या प्रकारच्या सिलिंडर, ट्रेडल अशा मशिनरीपेक्षा मोठे लायनोटाइप मशीन घेतल्यास अधिक काम करता येईल आणि उलाढाल वाढेल अशा कल्पनेने महाराष्ट्र सरकारच्या औद्योगिक कर्ज देणाऱ्या एका संस्थेकडून बाबाने तशा मशीनसाठी मोठे कर्ज घेतले. आमचा त्या व्यवहाराशी प्रत्यक्ष काहीच नव्हता, तरीपण धंद्याच्या दृष्टीने हे योग्यच पाऊल आहे अशी आमचीहि समजूत होती. मात्र प्रत्यक्षामध्ये बाबा गाळात रुतू लागला होता. शिस्तबद्ध व्यवसाय न केल्याने अर्कशाळा, यु.वे.बॅंक, शिवाजी महाविद्यालय अशी आमची जुनी गिऱ्हाइके पाठ फिरवू लागली. बाबाने निष्काळजीपणे एका वर्षी यु.वे. बॅंकेचे कॅलेन्डर जानेवारीनंतर एकदीड महिन्याने पूर्ण करून बॅंकेकडे दिले. आमचे काका भालचंद्र हरि (अण्णा) ह्यांचे व्याही डॉ. कोपरकर ह्यांच्या पुस्तकछपाईमध्ये बाबाने अतोनात दिरंगाई आणि चालढकल केली आणि त्यांचा कायमचा रोष मिळविला. आपलाच भाचा अतुल सोहोनी ह्याच्याबरोबरच्या व्यवहारात फौजदारी केस होईपर्यंत वेळ आणली आणि अतुलचे अतोनात नुकसान केले. भारतात सर्वत्र नवे व्यवसाय सुरू होत होते, शिक्षितांची संख्या प्रतिवर्षी

वाढत होती.  मुद्रणव्यवसायाला अत्यंत अनुकूल अशी ही परिस्थिति असूनहि बाबा ह्या वाहत्या गंगेतून एक लोटाहि उचलू शकला नाही.  उत्साहाने पणजोबांचे वृत्तपत्र त्याने दुसऱ्या अवतारात सुरू केले पण ते लवकरच बंद पडले.  पुण्यामुंबईला जाऊन कायम स्वरूपाचे काही पुस्तकाचे काम एखाद्या प्रकाशकाकडून मिळवावे अशा सूचना आमच्या धंद्याच्या मर्यादित समजुतीतून आम्ही केल्या पण तसे घडले नसावे पण व्यवसाय अतिशय गैदी आणि गैरशिस्त पद्धतीने चालला होता हे उघड दिसत होते.  अशी सर्वत्र दिवाळी चालू असतांना बाबाकडे मात्र कायमची एकादशी आलेली होती.  उलाढाल कमी होत होती.  नव्या मशीनच्या भुकेला हवे इतके काम बाबा आपल्याकडे खेचू शकत नव्हता.  पुण्यातील एकदोन चांगल्या मुद्रकांशी बाबाची ओळख करून दिली आणि त्यांचा सल्ला घेत जा म्हणून त्याला सांगितले पण 'मला सगळे कळते' ह्या अहंभावापोटी बाबाने हा सल्ला वापरला नाही. कर्जाचे हप्ते तुंबू लागले आणि कर्ज देणाऱ्या संस्थेकडून तगादे सुरू झाले.  हे असे पुढची ४-५ वर्षे चालत राहिले.

९) ह्यातून मार्ग काढण्यासाठी दगडापेक्षा वीट मऊ अशा समजुतीने कर्ज फिरवून साताऱ्यातील युनायटेड वेस्टर्न बँकेकडे बाबाने कर्ज वर्ग करून घेतले.  असे करण्यासाठी बँकेने गहाण मागितल्यावर बाबाने नानांची सही मिळवून राहते घरच जागेसकट तिकडे गहाण टाकले.  मात्र ह्या व्यवहाराचा जागेचे समाईक मालक ह्या नात्याने अन्य भाऊबहिणींना  थांगपत्ताहि बाबाने लागू दिला नाही.  ही गोष्ट नानांच्या १९९५ मधील मृत्यूपूर्वी एकदोन वर्षांमध्ये घडली असावी. नगरपालिकेच्या दप्तरात समाईक मालकीच्या ह्या मालमत्तेची नोंद नानांच्या नावाने होती परंतु वार्धक्यामुळे नानांची समज बरीच कमी झाली होती आणि नानांचा स्वभावहि सर्वांवर विश्वास ठेवण्याचा होता.  बाबाचा ह्यामध्ये काही अन्य हेतु असेल अशी शंका त्यांच्या मनात येणे शक्य नव्हते.  बाबाने मागितली तशी सही त्यांनी बिनतक्रार दिली, मधल्यामध्ये आम्हाला नकळत आमच्या हक्कांची मात्र पायमल्ली झाली.

१०) ह्या सर्व व्यवहाराची पहिली कल्पना मला १९९५ च्या सुमारास आली कारण माझ्या पुण्याच्या घराजवळच्याच यु.वे.बॅंकेकडून 'तुमच्या भावाच्या कर्जाचे हप्ते थकत आहेत' असा फोन मला आला. (मी मूळचा साताऱ्याचा आणि तेथून सुरुवात करून आयकर विभागात वरच्या स्थानापर्यंत पोहोचलेला. बॅंकहि तेथीलच. बॅंकेच्या वार्षिक चिरमुले व्याख्यानमालेमध्ये एक वर्षी व्याख्यान माझे ठेवले होते. त्यामुळे बॅंकेच्या चेअरमनपासून सगळे माझ्या वैयक्तिक ओळखीचे होते.) तरीहि घराच्या गहाण असण्याबाबत बाबा अजूनहि तोंडात मिठाची गुळणी धरून होता. त्याने स्वत:हून हे मला कधीहि सांगितले नाही. कर्जाची चौकशी करण्यासाठी मी साताऱ्यास जाऊन करंजे शाखेमध्ये पोहोचल्यावर शाखाप्रमुख श्री. कद्रे ह्यांनी मला सर्व कागद दाखविले आणि त्यावेळी पहिल्यांदा मला ह्या एकूण मामल्याची गंभीरता नीटपणे कळली. ह्या कर्जव्यवहाराचे माझ्या हाताने मी ७ एप्रिल १९९५ रोजी केलेले टिपण सोबत जोडले आहे(B). ह्या टिपणानुसार बाबाकडे बॅंकेचे सुमारे रु.१५,००,००० येणे होते आणि त्यासमोर गहाण म्हणून मालमत्ता रु. १०,००,००० + यन्त्रसामग्री रु. ८,५०,००० अशी तारणे दाखविली होती. (ह्याच मार्गाने आपल्या सरळमार्गी आणि सुस्वभावी सासऱ्यांचे पंढरपूरमधील घरहि त्यांची अशीच सही घेऊन बाबाने गहाण ठेवले होते. ह्याबद्दल ते - श्री कुलकर्णी - अनेकदा माझ्याकडे पुण्यास येऊन आपला संताप आणि अगतिकता व्यक्त करून गेलेले आहेत.) तदनंतर कर्जाचा रु. २५,००० चा थकलेला हप्ता जागीच भरून मी बाबाला तात्पुरते वाचवले.

११) पुण्यामध्ये माझ्या घराजवळच्या यु.वे.बॅंकेच्या मॅनेजरकडून मला कर्जाच्या परतफेडीबद्दल फोन येतच होते म्हणून जून १९९७ मध्ये मी साताऱ्यास जाऊन बॅंकेच्या जनरल मॅनेजरना भेटलो. घर विकण्याखेरीज कर्जफेडीचा अन्य मार्ग उपलब्ध नाही असे मला कळून चुकले होते पण योग्य किंमत मिळण्यासाठी

वाटाघाटी कराव्या लागतील अणि त्याला काही वेळ हवा ह्या सबबीवर मी त्यांच्याकडून काही मुदत मिळवली. तोपर्यंत वर उल्लेखिलेली एप्रिल १९९५ मधील थकलेली रक्कम रु.१५,००,००० आणखी वाढून बसली होती. त्या रकमेपैकी रु. ८,५०,००० ठेवून बाकीची रक्कम सोडून द्यायला बँकेने संमति दिली आणि ती फेडण्यासाठी ३-४ महिन्यांची मुदत देऊ केली. माझ्या जून १९९७ मधील सातारा भेटीचा आणि कर्जाची तडजोड केल्याचा निर्णय यु.वे.बँकेच्या जनरल मॅनेजरांच्या ८ ऑक्टोबर १९९७ ह्या तारखेच्या मला आलेल्या पत्रामध्ये आहे. त्याची प्रत (C) अशी पुढे दाखविली आहे.

१२) माझ्या जून १९९७ च्या बँकेशी झालेल्या वाटाघाटीनंतर रु. ८,५०,००० वर मामला तोडण्यास बँक तयार आहे असे बाबास सांगण्यास मी घरी गेलो आणि ह्या रकमेची तरतूद करण्यासाठी जागेला गिऱ्हाईक पहा असे मी त्याला सुचविले. तसेच कोणताहि निर्णय घेण्यापूर्वी मला कल्पना द्यायला विसरू नकोस असे मी आणि अरुणाने त्याला बजावून सांगितले. ह्याला मान डोलावण्यापलीकडे बाबाकडे पर्याय नव्हता आणि तशी मान त्याने डोलावलीहि पण प्रत्यक्षात बाबाच्या डोक्यात वेगळीच चक्रे फिरत होती असे आम्हाला पुढील परिच्छेद १३ आणि १४ मध्ये वर्णिलेल्या घटनांवरून कळले.

१३) मान्य झालेल्या रकमेची भरपाई त्वरित करा अशी मला आठवण करणारे जनरल मॅनेजरांचे ८ ऑक्टोबर १९९७ चे पत्र (C) मला पुण्यात मिळाले. पत्र येताच जून ते ऑक्टोबर ह्या काळात काय प्रगति झाली आहे हे पाहायचे आणि जागेवर जाऊनच पुढचे काय ते ठरवायचे अशा विचाराने मी लगेच साताऱ्यास गेलो. तेथे मी जे पाहिले ते मला अजून अतर्क्य वाटते. साताऱ्यात घरात शिरताच आम्हाला दिसले की बाबाचे कुटुंब घरातच नाही आणि 'आम्ही हे घर विकत घेतले आहे' असा दावा करणारे कोणी देवधर नावाचे गृहस्थ कुटुंबासह तेथे राहात आहेत.

बाबा कोठे होता तर निर्वासितासारखा पेठेतील एका जवळच्याच घरात आश्रय घेऊन होता. आम्ही आलो तसे परत फिरून पुण्यास गेलो पण जाण्यापूर्वी इतके कळले की घर आणि जागा विकण्याचे साठेखत त्यांना बाबाने करून दिले होते. नंतर मिळालेल्या माहितीनुसार साठेखतामध्ये अटीनुसार घराची पूर्ण किंमत रु. ७,२०,००० ठरली होती आणि त्यापैकी रु. १,५०,००० इतकीच रक्कम बाबाला हत्याहत्यात हातात मिळाली होती आणि तरीहि त्याने घराचा ताबा देवधरांना देऊनहि टाकला होता. खतामध्ये घराची मालकी पूर्णत: बाबाकडेच आहे अशी खरेदी करणाराची दिशाभूल करणारी वाक्यरचनाहि केली होती. ही लाखाचे बारा हजार करणारी व्यवहारज्ञानशून्य वर्तणूक पाहता घर हातातून जाते काय अशी भीति आमच्या मनात उत्पन्न झाली. साताऱ्यातून परत निघण्यापूर्वी देवधरांकडून मी त्यांच्या पुण्यातील थोरल्या भावाचा फोन नंबर घेतला होता. पुण्यात पोहोचताच तेथे फोन करून आम्ही सर्वजण बहीणभाऊ ह्या घराचे समाईक मालक आहोत आणि हे घर तुमच्या धाकट्या भावाला इतक्या सुखासुखी गिळंकृत करता येणार नाही असे मी त्यांना थोड्या धमकावणीच्या शब्दातच समजाविले आणि रु. १,५०,००० परत मिळाले की आपल्या भावाकडून घर खाली करून देण्याचा वायदा त्यांच्याकडून घेतला.

१४) वर उल्लेखिलेल्या साठेखताचे तपशील ते खत मी नंतर जेव्हा रद्द करून घेतले (पुढे पहा) तेव्हा मला कळले. त्यातील मुख्य तपशील असा की जून महिन्यात, जेव्हा मी बाबाच्या वतीने जनरल मॅनेजरना भेटून रक्कमेत सूट मिळविण्यासाठी आणि मुदत मागण्यासाठी तोंड वेंगाडत बसलो होतो, त्याच्या आधीच बाबाने मागच्या मागे, आम्हाला न कळवता, देवधरांच्याशी करार करून काही आगाऊ रक्कम २६ मे १९९७ रोजी घेतली होती, घर देवधरांना परस्पर फुंकून टाकण्याच्या कटाची पायाभरणी केली होती आणि त्या कारस्थानाचा आम्हाला थांगपत्ताहि लागून दिला नव्हता. आमची पाठ वळताच देवधरांकडून अजून काही थोडीफार

रक्कम - पूर्ण रकमेच्या सुमारे २०% - घेऊन बाबाने घर खाली करून त्यांच्या ताब्यातहि देऊन टाकले. घर ताब्यात आल्यावर नाना सबबी सांगून देवधरांनी रक्कम द्यायची टाळाटाळ सुरू केली असती तर त्यातून आणखी कोणती गुंतागुंत उभी राहिली असती ह्याचा विचारच करवत नाही.

१५) लगोलग पुण्याला परतून बाळासाहेब भिडे आणि अनीश साने ह्यांना ह्या सर्व व्यवहाराची कल्पना मी दिली. आम्ही तिघांनी मिळून प्रत्येकी रु ५०,०००० असे रु.१,५०,००० एक-दोन दिवसांत उभे केले. नंतर सातार्‍यास जाऊन ती रक्कम देवधरांच्या हातात वकीलाच्या ऑफिसात परत केली आणि बाबा आणि देवधरांमधले साठेखत रद्द करवून घेतले. नोटरीसमोर २९ नोवेंबर १९९७ला नोंदवलेला ह्याचा कागद पुढे आहे (D). साठेखताचे आम्हाला कळलेले आणि क्र.१४ मध्ये उल्लेखिलेले तपशील तेथेच पाहण्यास मिळतील. हे रु.१,५०,००० आणि पूर्वीचे रु.२५,००० ह्याचे आम्हांपैकी कोणासच पुन: दर्शन झालेले नाही आणि असल्या गाढवपणातून तुम्ही मला सोडवलेत असा काही कृतज्ञतेचा शब्दहि बाबाच्या तोंडातून आजतागायत निघालेला नाही. (ह्या मध्ये माझ्या दोन बहिणींनी केवळ माहेरच्या घराच्या कृतज्ञतेमधून ह्या रकमा दिल्या होत्या हे येथे मुद्दाम लिहितो. ह्या त्यागातून त्यांना काही खास मिळणार होते असे नाही.)

१६) बाबाच्या अडचणी चालूच होत्या. जागा विकण्यासाठी योग्य गिर्‍हाईक आमच्या संमतीने निवडण्यासाठी बाबा काही हालचाल करतांना दिसत नव्हता. चालता छापखाना नीट चालावा असेहि काही करताना बाबा दिसत नव्हता. घरातील एकेक जुन्या वस्तु, तांब्यापितळयाची जुनी भाडीकुंडी, चांदीची भांडी, हळूहळू गुप्त होत होत्या आणि त्या विकून बाबाचा संसार चालत होता असे वाटते. आमच्या घरंदाज आणि प्रतिष्ठित घरातील जुने आजी-पणजी-आजोबा

अशांसारख्यांचे पोर्ट्रेट-फोटो, आजोबांनी १९१६मध्ये राजकोटला घेतलेला मोठा बेल्जियन आरसा, आणि अन्य अनेक heirloom दर्जाच्या म्हणता येतील अशा वस्तु धुळीमध्ये माळयावर पडल्या होत्या. पूर्वजांच्या चित्रांना बाबाच्या घरात जागाच नव्हती. बसायच्या खोलीत आजोबा हरि गणेश ह्यांच्या पेटीत त्यांच्या पूर्वीच्या पिढ्यांची पत्रे, त्यांचे काका बळवंतदादा ह्यांची दत्ताची कवने, त्यांच्या आजोबांचे - नारोपंतांचे हस्ताक्षर, ' महाराष्ट्र मित्र ' ह्या पणजोबांच्या वृत्तपत्राचे अंक अशा अनेक कौटुंबिक दृष्ट्या संग्राह्य गोष्टी होत्या आणि माझ्या आजोबांनी त्या अनेकवेळा मला दाखविल्या होत्या. त्यांपैकी वर उल्लेखिलेले फोटो आणि बेल्जियन आरसा हे मी वेळीच वाचवले पण बाकी चिजा कोठे नष्ट झाल्या हे मी सांगू शकत नाही. पणजोबांचे छपाईचे जुने मशीन, सुमारे आता १५० वर्षे इतके जुने, छापखान्यात उभे राहून सेवा देतच होते कारण प्रुफे काढण्याचे काम त्यावर होई. संग्रहालयात असावे अशा दर्जाच्या त्या यन्त्राची काय वासलात बाबाने लावली हे बाबालाच ठाऊक! छापखान्यातील बाकीचीहि यन्त्रे कोठे गेली कोणास ठाऊक.

१७) (त्याहि परिस्थितीत बाबाची मुलगी संहिता हिचे शिक्षण पुण्यात अधिक चांगले होईल असे वाटून तिचा पुण्यात कॉलेजप्रवेश आणि राहण्याची सोय माझी बहीण मंदाकिनी आणि बाळासाहेब भिडे ह्यांनी आपल्या घरी केली होती. आम्हीच सर्वांनी सातार्याच्या एका भेटीत 'हिला शिक्षणासाठी पुण्यास पाठव' असे बाबाला पटविले होते. तदनुसार १९९८ ते २००२ ह्या चार वर्षात तिचे बी.कॉमचे शिक्षण पुण्यात बहुतांशी माझ्या बहिणीच्या घरी राहून झाले. 'बहुतांशी असे म्हणतो ह्याचे कारण असे तेथे ३ वर्षे राहिल्यावर B.Com शेवटच्या वर्षाच्या वेळी ती सातार्यास परतली आणि पुण्यास येऊनजाऊन तिने चौथे वर्ष संपविले. पर्यंत ती पोहोचली तेथे शेवटच्या परीक्षेच्या वेळी 'बाळासाहेबांच्या मुळे कोठलातरी निरोप मला मिळाला नाही आणि त्यामुळे माझे मार्क गेले' असा काही आरोप तिने त्यांच्यावर केला आणि

कसलेहि अन्य स्पष्टीकरण न देता संबंध एकतर्फी तोडले. बाळासाहेब स्वत: शिक्षणक्षेत्रामध्ये १९६५ पासून विविध संस्थांमध्ये काम करीत आले आहेत. शेवटची वीसेक वर्षे ते पुण्यातील महाविद्यालयांमधून प्राचार्य म्हणून राहिलेले आहेत. त्यांची विद्यार्थिप्रियता आणि विद्यार्थ्यांना मदत करण्याची सवय मी स्वत:च्या डोळ्यांनी पाहिली आहे. कुटुंबातहि सर्वांना अनलस मदत करण्याच्या त्यांच्या स्वभावाची सर्वजण ग्वाही देतात. अशा माणसावर संहिताने बिनबुडाचे आरोप करावेत आणि बाबाने त्याबाबत तिला एका शब्दानेहि जाब विचारू नये ह्याचे मला नेहमीच आश्चर्य वाटत आले आहे. बाळासाहेबांचे घर सोडल्यावर ती परत तेथे कधीहि आलेली नाही आणि बोलणेहि तिने टाकलेले आहे. 'तू इतके वेळा भारतात येतेस. पुण्यात का येत नाहीस' असा प्रश्न तिला अलीकडे केला गेला असता 'पुण्यात माझे आहेच कोण?' असा उद्धट उलटजबाब करण्याइतपत तिचा कृतघ्नपणा आता पोहोचला आहे.)

१८) यु.वे.बँकेचा कर्जफेडीचा तगादा चालूच होता. अखेरीस थकित कर्जांच्या प्रकरणांचा उलगडा करण्यासाठी जे लवादमंडळ निर्माण झाले आहे तेथे बँक जाऊन पोहोचली. आम्हा कोणाचीच नावे बँकेच्या दप्तरी नव्हती त्यामुळे मामल्याची नोटिस आम्हाला आली नाही पण दुसरे गहाणदार, बाबाचे सासरे श्री कुलकर्णी, ह्यांना गेली. आपले घर हातातून जाऊन आपण वृद्धापकाळी बेघर होणार अशा भीतीने ते पुण्यास आले आणि नोटिस आल्याचे त्यांनी मला सांगितले. नंतर तारीख पडल्यावर ते आणि मी सुनावणीच्या वेळी महाराष्ट्र बँकेच्या शनिपाराजवळील मोठ्या इमारतीत लवादमंडळाच्या कार्यालयात उपस्थित होतो. येथे मात्र बाबाच्या वकिलाने उलटाच पवित्रा घेतला. गहाण ठेवलेली मालमत्ता एकत्र कुटुंबाच्या समाईक मालकीची आहे, बँकेने कुटुंबातील अन्य सदस्यांच्या संमतीशिवाय त्या समाईक घराच्या तारणावर कर्ज दिलेच कसे, आणि ह्या त्रुटीमुळे

बॅंकेला घर कर्जापोटी विकताच येणार नाही असे त्याने लवादमंडळाच्या निदर्शनास आणले. लवादमंडळाला हा मुद्दा पटून बॅंकेने काही रक्कम बुडीत खाती मांडायची आणि एकूण कर्जापोटी रु. ३,६२,००० घ्यायचे असा निर्णय मंडळाने दिला आणि बाबा काही प्रमाणात सुटला. कागदपत्रांची पूर्ण शहानिशा न करताच भोंगळपणे कर्ज मंजूर करणे हे बॅंकेच्या चांगलेच अंगाशी आले आणि बॅंकेला सुमारे १२ लाखाला फोडणी बसली असा हिशेब उपलब्ध आकड्यांवरून दिसतो. व्याज दूरच राहिले, बॅंकेचे मुद्दलहि काही प्रमाणात बुडले. लवादमंडळाने ही रक्कम भरण्यासाठी बाबाला २८ फेब्रुअरी २००२ पर्यंत मुदत दिली.

१९) आता जुने घर पाडून तेथे नवी इमारत उभी करून तिच्यातील गाळे विकून बाबाची कर्जफेड करणे हा एकच मार्ग उरला आहे असे दिसतच होते. त्या दृष्टीने बाबाशी काही बोलणी करण्याचा प्रयत्न मी केला. अशा घराला किती खर्च येईल आणि त्यातून किती रक्कम उभी राहू शकेल ह्याचा अंदाज मिळावा आणि ह्यासाठी आपणच काही हालचाल करावी म्हणून मी माझ्या परिचयातील एकदोन बांधकाम तज्ञांना घेऊन साताऱ्यास गेलो होतो पण त्यांच्याशी बोलण्यात बाबाला काहीच स्वारस्य नव्हते असे दिसले. पुढील घटनांवरून आता असे म्हणता येईल की घर विकण्याच्या प्रक्रियेमध्ये त्याला निरंकुश स्वातन्त्र्य हवे होते जेणेकरून घराची विल्हेवाट त्याने मनाशी योजिलेल्या मार्गाने आणि इतरांना परिघाच्या पूर्णत: बाहेर ठेवून त्याला लावता आली असती पण आम्हास तेव्हा हे सुचले नाही. बाबा तेथे स्वत: राहात असल्याने त्याच्या संमति आणि सहकार्याशिवाय आम्ही बाहेरगावी राहून उंटावरून शेळया हाकणे अवघड होते हीहि अन्य वस्तुस्थिति होती.

२०) दोनअडीच वर्षे अशीच गेली आणि आम्ही दोघे भारत सोडून कायमच्या वास्तव्यासाठी कॅनडाला जाणार असे जानेवारी २००२ मध्ये निश्चित झाले. बाबाला हे कळताच तो लगोलग पुण्यास माझ्याकडे आला आणि ’तू कॅनडात. अन्य

भाऊबहिणीहि साताऱ्याबाहेर, अशा स्थितीत घराबाबत मला कोणाशीच वाटाघाटी करता येणार नाहीत, दुसऱ्या बॅंकेकडून काही रक्कम घेताहि येणार नाही ’ असे आम्हाला सांगून आमच्याकडून त्यासाठी आवश्यक ती Power of Attorny त्याने १५ जानेवारी २००२ ला करून घेतली(E). आम्हालाहि ते पटले आणि आम्ही नंदीबैलासारख्या माना डोलावून लगेच दाखविलेल्या कागदावर सह्या केल्या. पूर्वीचा दोन वेळचा बाबाच्या हातखंड्यांचा कटु अनुभव पदरी असूनसुद्धा आम्ही महामूर्ख काहीहि शिकलेलो नव्हतो आणि बाबा आपल्याला दगा देईल असे आम्हा कोणास स्वप्नातहि वाटले नाही. त्याचवेळी कायदेशीर कठोरपणा दाखवून साताऱ्याला वृत्तपत्रांमध्ये वकिलाकडून समाईक मालकीची नोटिस देणे, जागेवर तसे जाहीर करणारी पाटी उभी करणे असे काही वेळीच केले असते तर पुढचे कटु प्रकार टळले असते पण आपल्याच भावावर असा अविश्वास कसा दाखवायचा, कुटुंबातील मतभेद चव्हाटयावर कसे आणायचे अशा विचारांनी आम्ही तसे काही केले नाही. तरीसुद्धा आम्ही बाबाकडून एक हमीपत्र(F) लिहून घेतले की बॅंकेचे सध्याचे कर्ज फेडण्यासाठी नव्या धनकोला गहाण देता यावे ह्या साठीच सदर १५ जानेवारी २००२ च्या Power of Attorny चा उपयोग केला जाईल, विशेषत: घराची आणि जागेची मालकी संक्रमित करण्यासाठी तिचा वापर बिलकुल केला जाणार नाही. इतके स्वच्छ हमीपत्र बाबाच्या चालू अडचणीमध्ये त्याला उपयोगी पडेल आणि आमचेहि हक्क सुरक्षित राहतील इतक्याला पुरेसे असेल असे आम्हाला वाटले. असे वाटण्यामागे बाबा ह्या हमीपत्राला पूर्णत: झुगारून देण्याच्या नीच वृत्तीचा असेल अशी आम्हा कोणासच शंका आली नाही.

२१) ह्या शोकान्तिकेचा अखेरचा अंक आता सुरू होतो. परिच्छेद २० मधील घटनांनंतर एकाच आठवड्यात २१ जानेवारीला मी कॅनडाकडे रवाना झालो. पत्नी अरुंधती १० जानेवारीलाच पहिल्या नातवाच्या जन्माची दिलेली वेळ साधण्यासाठी कॅनडामध्ये पोहोचली होती. भाऊ (अच्युत) तिकडे दूरवर

अल्लापल्लीला आणि मी कॅनडात अशी स्थिति निर्माण झाली.  भाऊ तसाहि त्याच्या आर्थिक आणि तब्येतीच्या चिंतेने गांजलेला.  ह्यानंतर लवकरच तो परलोकी गेला.   पुढची दोनतीन वर्षे सातारच्या घराकडे आमचे सर्वांचेच वेगवेगळया कारणांनी काहीसे दुर्लक्ष झाले असे आता पश्चात्बुद्धीने म्हणावेसे वाटते. आम्ही झोपलेलो असतांना बाबा मात्र पूर्ण जागा राहून आपल्या शिजत असलेल्या कटाला शेवटची फोडणी देण्याच्या तयारीमध्ये होता.  आमची पाठ फिरताच बाबाने लगोलग हालचाली करून कोणी कॉंट्रॅक्टर गाठला, नगरपालिकेमध्ये योग्य तेथे पेरणी करून नानांच्या पश्चात आमची सर्वांची कायद्यानुसार वारस म्हणून आमची नोंद व्हायला हवी होती ते न करता आपल्या एकटयाच्या नावाने तशी नोंद घडवून आणली. ह्या कशाचेच तओअशील आम्हा कोणास बाबामे आजतागायत कळू दिलेले नाहीत. ह्या कामी आम्ही दिलेल्या Power of Attorny चा दुरुपयोग झाला असावा किंवा बाबाने योग्य ती 'पेरणी' करून हे घडवून आणले असावे अशी मला शंका येते.  लगोलग जुने घर पाडून त्या जागी चार मजली नवी इमारत बांधून तिच्यातील गाळे विकूनहि टाकले.  हे सगळे होण्यास दोन-अडीच वर्षे निश्चित लागली असणार पण Power of Attorny हवी होती तेव्हा चार दिवसात तीन चकरा मारणाऱ्या बाबाने आता मात्र आम्हाला वा पुण्यातच राहात असलेल्या आपल्या बहिणींना एका फोननेसुद्धा  ह्यातील काहीच सांगितले नाही आणि 'गरज सरो आणि वैद्य मरो ' ही म्हण खरी ठरवली.  ही वार्ता सांगोवांगीवरूनच आम्हाला काही वर्षांनंतर कळली.  ह्या सर्व व्यवहारामध्ये बाबाच्या हाती काय आले आणि चोरापोरांनी काय पळविले ह्याचा आम्ही काहीच तर्क करू शकत नाही. आमचे वडिलोपार्जित घर असे कायमचे उद्ध्वस्त झाले.  येथे बाबाच्या पूर्वींहि राहणारे कोणी होऊन गेले ह्याचा कोणास पत्ता लागू नये असा कडेकोट बंदोबस्त बाबाने केला आहे.

२२) तदनंतर काही वर्षांनी बाबाला मदत करणाऱ्या आम्हा सर्व भावाबहिणींच्या वतीने मी बाबाला एक पत्र पाठवून ५-६ वर्षे पडून असलेले आमचे पैसे त्याने व्याजासकट परत करावेत असे पत्र लिहिले. बाबाने त्याकडे पूर्ण दुर्लक्ष केले कारण कोठलाच नैतिक बंध तो मानत नाही. आमचे पैसे तसेच बाबाच्या उधळमाधळीत संपून गेले. तदनंतर एकदा मी बाबाला फोन करून 'आपली चूक झाली' इतकेच तू कबूल कर, आम्ही सर्व विसरायला तयार आहोत असे सांगायचा प्रयत्न केला पण माझ्याशी बोलायला बाबा फोनवर आलाच नाही. कठिण प्रसंगांमध्ये बायकोला पुढे करून तिच्यामागे दडण्याच्या त्याच्या जुन्या सवयीनुसार त्याने आपली पत्नी सुजाता हिला पुढे केले. 'हे माझे ऐकत नाहीत' अशा सोयीस्कर सबबीवर तिनेहि आपली सुटका करून घेतली.

२३) तदनंतर माझे बाबाशी बोलणे संपूर्ण बंद आहे. संहिताच्या विवाहाचे रीतसर आमन्त्रण त्याने पाठवले नाही वा साधा फोनहि त्याने आम्हाला केला नाही. (कॅनडामधून आम्ही पाठविलेले आहेराचे रु १०,०००, तसेच अन्य भावाबहिणींकडून आलेले आहेर मात्र बिनतक्रार घेतले. तेथे त्याला काहीच वावगे दिसले नाही. मात्र त्याचीहि काही पावती नाही.) साताऱ्याच्या घराला २००२ सालापासून मी भेट दिलेली नाही आणि तेथे जाण्याची माझी इच्छाहि नाही. अशा रीतीने आमचा बालपणापासूनचा सातारा-संबंध बाबाच्या कर्तृत्वामुळे तुटला.

२४) काही दिवसांपूर्वी वेदांगच्या विवाहाची निमन्त्रणपत्रिका, अन्य कोठल्याहि वैयक्तिक संदेशाविरहित, whatsapp वरून माझ्याकडे आली. तेथे सर्वात पहिले निमन्त्रक म्हणून आम्हां दोघांची नावे आहेत. असे करण्यापूर्वी आम्हाला कसलीच वार्ता ह्या विवाहाविषयी मिळाली नव्हती. आमची नावे घालण्यापूर्वी आम्हाला पूर्ण कल्पना का देण्यात आली नाही आणि सहीसाठी आमची संमति का घेतली गेली

नाही असा प्रश्न आमच्यापुढे उभा राहिला आहे. इतके सगळे रामायण घडल्यावर देखाव्यासाठी आमचे नाव पत्रिकेत टाकण्याचा निर्लज्जपणा बाबाच करू जाणे!

जोडलेल्या कागदांची यादी आणि संदर्भ:

(A) ४ जानेवारी १९८८ ह्या दिवसाचा ठराव. परिच्छेद ७ पहा.

(B) कर्जव्यवहाराचे मी ७ एप्रिल १९९५ रोजी केलेले टिपण. परिच्छेद १० पहा.

(C) यु.वे.बँकेच्या जनरल मॅनेजरांचे ८ ऑक्टोबर १९९७ ह्या तारखेचे पत्र. परिच्छेद ११ पहा.

(D) नोटरीसमोर २९ नोवेंबर १९९७ ला नोंदवलेला देवधरांबरोबरचे साठेखत रद्द करणारा कागद. परिच्छेद १५ पहा.

(E) १५ जानेवारी २००२ तारखेची Power of Attorny. परिच्छेद २० पहा.

(F) बाबाने त्याच वेळी लिहून दिलेले हमीपत्र. परिच्छेद २० पहा.




क्र. १५ ... ९५३ तारीख ४-७-८८

स्टॅंपव्हेंडर ... सातारा

... नं. ८/१९६६

॥ श्री ॥

## वाटपकरार

सातारा येथील शुक्रवार पेठ सि.स.नं. ७७ येथे नारायण हरि कोल्हटकर, भालचंद्र हरि कोल्हटकर, व बाळकृष्ण हरि कोल्हटकर यांच्या समाईक नांवावर घर व महाराष्ट्र मित्र मुद्रणालय या नावाचे मुद्रणालय आहे. बाळकृष्ण हरि कोल्हटकर यांनी दिनांक:: १५/ ९/ १९८६ रोजी सदर मालम-तेवरील आपला हक्क मा. तहसिलदार व तालुका दंडाधिकारी यांचे समोर प्रतिज्ञापत्राव्दारे सोडून दिला आहे. कै. भालचंद्र हरि कोल्हटकर हे दिनांक:: १-फेब्रुवारी-१९८४ रोजी डोंबीवली येथे मरण पावले. त्याचे वारस श्रीमती प्रमिला भालचंद्र कोल्हटकर [पत्नी] व दिलीप भालचंद्र कोल्हटकर यानीही सातारा येथील आपल्या हिश्याच्या मिळकतीवरील हक्क दिनांक:: [illegible] १९८७ रोजी प्रतिज्ञापत्रा अन्वये सोडून दिला आहे. उपरोक्त दोन्ही प्रतिज्ञापत्रे सातारा येथे सिटीसर्व्हे ऑफिसर यांचे कडे वरील दोघांची नावे कमी करण्यासाठी गुदरण्यात आली असून त्यामुळे आता या मालम-तेचे [१] नारायण हरि कोल्हटकर हे एकटेच वारस आहेत. नारायण हरि कोल्हटकर यांना अनुक्रमे [१] अरविंद नारायण कोल्हटकर [२] अच्युत नारायण कोल्हटकर [३] सौ. मंदाकिनी सदाशिव भिडे [४] सौ. अनुराधा गोपाळ मराठे

[५] संजय नारायण कोल्हटकर [६] अल्पना अनिता साने आशी सहा मुले असून हि सर्व सज्ञान आहेत. श्री नारायण हरि कोल्हटकर व हि सहा मुले हि ७७- शुक्रवार पेठ, सातारा येथील मिळकतीचे हिस्सेदार आहेत. हि स्थावर व जंगम मालम-त्ता खालील प्रमाणे आहे....

| | | | |
|---|---|---|---|
| १] | सिलेंडर मशिन व मोटार | २३x३६ | रु. २५,०००=०० |
| २] | सिलेंडर मशीन व मोटार | २०x३० | रु. २०,०००=०० |
| ३] | सिलेंडर मशिन | १८x२३ | रु. २०,०००=०० |
| ४] | ट्रेडर मशिन | १२x१८ | रु. २०,०००=०० |
| ५] | ट्रेडर मशिन | १०x१५ | रु. १०,०००=०० |
| ६] | कटिंग मशिन व मोटार | ३२ इंची | रु. १८,०००=०० |
| ७] | स्टिचिंग मशिन | | रु. १,०००=०० |
| ८] | रुलिंग मशिन | | रु. २,०००=०० |
| ९] | पंचिंग मशिन | | रु. १,०००=०० |
| १०] | परफोरेटिंग मशिन | | रु. ५,०००=०० |
| ११] | हॅन्ड प्रेस | | रु. १,०००=०० |
| १२] | टाईप | १००० किलो | रु. ३५,०००=०० |
| १३] | अन्य साधने | [ नंबरींग स्टीक्स इत्यादी. ] | रु. १०,०००=०० |
| १४] | गुडविल | | रु. २६,०००=०० |
| १५] | घर अंदाजे ४००० स्के.फू. वरील जुने बांधकाम | | १,००,०००=०० |
| १६] | सोन्याचे दागीने | | रु. ४०,०००=०० |
| १७] | चांदिची भांडी. | | रु. १०,०००=०० |
| १८] | गृहोपयोगी साधने | | रु. १०,०००=०० |
| | एकुण :: | | ३,८०,००० =०० |

श्री. नारायण हरि कोल्हटकर यांच्या तीनही विवाहित मुलींनी या मालम-तेवरील हक्क सोडून देण्याचे मान्य केले असून तशा स्वरूपाच्या करारावर सह्या करण्यात मान्यता दिली असल्याने आता या मालम-तेचे श्री.नारायण हरि कोल्हटकर , अरविंद नारायण कोल्हटकर, अच्युत नारायण कोल्हटकर, व संजय नारायण कोल्हटकर हे चार हिस्सेदार आहेत.

या चौघांनी दिनांक: २९-१२-१९८७ रोजी पुणे येथे श्री. स.ह. भिडे व श्री. शां. दोमले यांचे उपस्थितीत या मालम-तेचे वाटप करणेचे मान्य केले असून सदर वाटप खालील प्रमाणे होणार आहे.

श्री. अरविंद नारायण कोल्हटकर यांनी सदर मालम-तेतील आपला [illegible] वस्तु [ मशिनरी] अगर रोख रुपये ७५,०००/- घेऊन संजय नारायण कोल्हटकर यांना देण्याचे मान्य केले आहे. रोख रक्कम अगर मशिनरी घेण्याचे पुर्ण स्वातंत्र्य अरविंद नारायण कोल्हटकर यांना असुन ते मांगतील त्या स्वरुपांत ७५,०००/- देणे संजय नारायण कोल्हटकर यांचेवर बंधनकारक आहे. व ते संजय नारायण कोल्हटकर यांना मान्य आहे. सदर रक्कमेपैकि [illegible] नारायण कोल्हटकर यांना मान्य होईल अशया स्वरुपांत रुपये [illegible] ३१-५-१९८८ पूर्वी व उर्वरीत २५,०००/- ३१-५-१९८९ पूर्वी [illegible] नारायण कोल्हटकर यांनी देणेचे आहे. हि रक्कम दिल्यावर [illegible] नारायण कोल्हटकर यांचा सदर मालम-तेतील हिस्सा नष्ट होणार [illegible] तो १/४ हिस्सा संजय नारायण कोल्हटकर यांचे नांवे होणार आहे. [illegible] प्रमाणे श्री अच्युत नारायण कोल्हटकर यांना आज पर्यंत वेळो-वेळी [illegible]-तेतील यादीत दाखविलेल्या पैकि रुपये ४०,०००/= सोन्याच्या दागीन्याच्या स्वरुपांत देण्यात आले असुन १५,०००/- रोख स्वरुपांत अच्युत नारायण कोल्हटकर यांना दिले आहेत. अच्युत नारायण कोल्हटकर यांनी त्याना स्वत:ला सोईस्कर वाटत असेल त्या ठिकाणी स्वत:चे मुद्रणा लय सुरु करण्याचे ठरविले असुन त्यासाठी अंदाजे ५०,०००/- किंमतीची मुद्रण सामुग्री संजय नारायण कोल्हटकर यांनी अच्युत नारायण कोल्हटकर याना मान्य केले आहे. सदर सामुग्री एक ट्रेडल मशिन, एक कटिंग मशिन, अंदाजे ५०० किलो टाईप एक स्टींग मशिन, दोन ॲटोमेटीक नंबरींग मशिन एक हाताचे नंबरींग मशिन, व आवश्यक वाटतील ती अन्य साधने याचा समावेश आहे. सदर व्यवहार तातडीने पुर्ण करण्याचा असुन या व्यवहाराच्या पुर्तीनंतर अच्युत नारायण कोल्हटकर यांचा १/४ हिस्सा त्यानी संजय नारायण कोल्हटकर यांना देण्याचे मान्य केले आहे. यासाठी या करारावर सह्या करीत असतांना संजय नारायण कोल्हटकर यांनी रोख रुपये २,०००/= व अच्युत नारायण कोल्हटकर यांनी सांगीतल्या प्रमाणे टाईप त्याच्या ताब्यात दिला आहे.

व वाटपाच्या व्यवहारात प्रारंभ केला आहे. वरील दोन्ही व्यवहार पुर्ण झाल्यावर सदर मिळकतीतील ३/४ मिळकत हि संजय नारायण कोल्हटकर यांच्या नांवे होणार असुन उर्वरीत भागांवर श्री. नारायण हरि कोल्हटकर याचा अधिकार व मालकी राहणार आहे.

[ पान ४ वर पहा. ]

श्री संजय नारायण कोल्हटकर यांना त्याचे बंधू अरविंद नारायण कोल्हटकर व अच्युत नारायण कोल्हटकर यांनी त्याच्या सातारा येथील शुक्रवार पेठेतील सि.स.नं. ७७ येथील घर व मुद्रणालय यांतील त्या दोघांचा हिस्सा वरील प्रमाणे पैसे व मशिनरी घेऊन तोडून देणेचा असून त्या प्रमाणे सिटी सर्व्हे ऑफिस व इतर ठिकाणी आवश्यक असेल तेथे सहया, जाबजबाब व सम्मती देणेची आहे.

येणे प्रमाणे करारनामा असे.

सातारा
दिनांक:: / /१९

१] N. H. Kothalkar
२] [signature]

सा क्षि दा र
::::::::::

३] [signature]
४] [signature]

१] चि.म.देशमुख
नांव:: चिंतामण महादेव देशमुख
प-ता:
१८७ व्यंकटपुरा सातारा

५] [signature] 12/4/66

२] पी.एम.दामले
नांव :: P. M. Damle
प-ता : 218, Pratapganj Satara

६] ______________
७] [signature]

::::::::::::::

B

Term loan Rs. 10, 50.000 7/4/95
C.C. limit 2, 25,000

Loan term i) Rs. 25, 690 p.m. EMS initial
ii) Rs. 35, 690 p.m. EMS Revis.
wef 1.10.95

Baba at Satara

Balance O.S. Term loan Rs. 12, 52,000
+sept int 58, 800
C.C. 13, 10, 800

C.C. 1, 85, 500
+sept 9,300
15, 05, 600

Total recovery to date Rs. 55,000

Security Machinery Rs. 8, 50,000
Property 10, 00, 000

Shri Kadre Tel 50237 (O)
30422 (R) (requ

C

AM. : YOURBANK
LEX : 0147-212 UWBK IN
X : (02162) 31884
23545
L. : (02162) 32246, 31722, 31723
32912, 32913
31511



# THE UNITED WESTERN BANK LTD.

HEAD OFFICE, SATARA.
172/4, RAVIWAR PETH, SHIVAJI CIRCLE,
SATARA - 415 001

R&RD/BR/97/4036

October 8, 1997.

Shri Arvind Kolhatkar,
"Maharashtra Mitra"
Near York Dale Apartment,
Erandawana,
PUNE - 4.

Dear Sir,

**Sub : Repayment of dues on account of M/s Maharashtra Mitra Mundranalaya.**

We refer to the personal discussions you had with the undersigned at our Head Office, Satara, in June, 1997, regarding settlement of dues of Maharashtra Mitra Mundranalaya of our Karanje Branch, Satara.

It was promised by you to make payment of Rs. 8.50 lacs, immediately, if the account is settled. As requested by you, the account has been settled and the decision of our Bank to accept Rs. 8.50 lacs from you for settlement of Term Loan account has been informed to you through our Branch Manager,Ganesh Nagar Branch, Pune. We are expecting the payment from you as assured.

We request you to please look into the matter urgently and do the needful at your earliest.

Thanking you,

Yours faithfully,

GENERAL MANAGER.




वि. नं. ५४८

२१।११।९८

कि: रु. १० बु. नि. का. सातारा जिल्हा

घेणार आनंद काशीनाथ देवधर रा. सातारा

हस्ते




॥ श्री गजानन प्रसन्न ॥

करारनामा

1) श्री. संजय नारायण कोल्हटकर — पार्टी नं. १
   व. व. 46, धंदा व्यवसाय, — (लिहून देणार)
   रा. 77, शुक्रवार पेठ सातारा.

2) श्री आनंद काशीनाथ देवधर — पार्टी नं 2
   व. व. 38, धंदा नोकरी — (लिहून घेणार).
   रा. 92 क, शुक्रवार पेठ सातारा

कारणे करारनामा लिहून देतो की, पार्टी नं १ यांनी पार्टी नं २ यांना, पार्टी नं. १ यांचे कुटुंबाचे मालकीचे शहर सातारा, पेठ शुक्रवार, सि. स. नं. 77 मधील अंदाजे 1240 चौ. फू. जागा, त्यावरील अंदाजे 1645 चौ. फू. क्षेत्राची RCC बांधकामासहित ही मिळकत रक्कम रु. 7,20,000/- (रु. सात लाख वीस हजार मात्र) यास खरेदी देण्याचे ठरवून ता 28/5/97 रोजी साठेखत लिहून पार्टी नं 2 यांचे

......2

... नं. १ व पार्टी नं. २ यांच्या दरम्यान ता. २८/८/९७ चे
साठेखताच्या अंमल कोणीही यापुढे करावयाच्या नाही असे ठरले आहे.
सदरील साठेखतातील शर्तीप्रमाणे पार्टी नं. १ यांनी पार्टी नं. २ यांचेकडून
वेळोवेळी घेतलेली रक्कम रु. १५०००/- (रु. एक लाख पन्नास हजार
फक्त) ही पार्टी नं. १ यांनी पार्टी नं. २ यांना आजरोजी परत दिली
आहे. पार्टी नं. २ यांनी पार्टी नं. १ यांचे मिळकतीत ती मिळकत
राहण्यायोग्य करण्यासाठी जी रक्कम खर्च केली ती रक्कम रु. ५०००/-
ही पार्टी नं. १ यांनी पार्टी नं. २ यांना दिली आहे.

पार्टी नं. १ यांनी शहर सातारा पेठ शुक्रवार, सि.स.नं. ९२
मधील फ्लॅट क्र. ९ चा ताबा हा पार्टी नं. २ यांना ता. ११/१०/९७ रोजी
दिला असून त्या बाबत पार्टी नं. १ यांची कोणतीही तक्रार नाही व
सदर फ्लॅटवर कोणताही हक्क सांगणार नाही असे पार्टी नं. १ यांनी
कबूल केले आहे. तसेच ता. २८/८/९७ च्या साठेखताप्रमाणे पार्टी नं. २
यांना, पार्टी नं. १ यांनी शहर सातारा पेठ शुक्रवार, सि.स.नं.
७७ मधील जो कब्जा दिला होता तो कब्जा पार्टी नं. २ यांनी
साठेकरार रद्द झाल्यामुळे पार्टी नं. १ यांना आजरोजी दिला.

वरीलप्रमाणे पार्टी नं. १ व पार्टी नं. २ यांचे दरम्यान
ता. २८/८/९७ रोजी झालेले साठेखत हे या लेखाने रद्द करणेत
आले आहे. त्या साठेखताच्या अगर त्यातील कोणत्याही शर्तीचा अंमल
पार्टी नं. १ अगर पार्टी नं. २ यांनी करणेचा नाही. तसेच यापुढे
सि.स.नं. ७७, शहर सातारा पेठ शुक्रवार या मिळकतीवर असलेल्या
कोणत्याही बँकेचा अथवा पतसंस्थेचा असणारा कोणत्याही स्वरूपाचा बोजा
अथवा कौटुंबिक जबाबदारीशी हक्क पार्टी नं. २ यांना पोहचू देणार नाही
असे पार्टी नं. १ यांनी मान्य केले आहे. याची मूळ ... पार्टी नं. १ यांचेकडे
ठेवला आहे. पार्टी नं. २ कडे त्याची झेरॉक्स दिली आहे.
सदरील व्यवहाराबाबत आता कोणाची कोणतीही तक्रार राहिलेली
नाही. सदर व्यवहाराचे वेळी तयार केलेले साठेखत, मूळ पावत्या व
त्याच्या झेरॉक्स या दोन साक्षीदारांसमक्ष नष्ट करण्या आहेत.

सदर करारनामा हा पार्टी क्र. १ व पार्टी क्र. २ यांनी पूर्णपणे
शुद्धीत, कोणाच्याही दडपणाशिवाय केलेला आहे.

येणेप्रमाणे करारनामा लिहून देवला असे. ता. ३०/११/९७

(पार्टी क्र. २)
(आनंद काशीनाथ देवधर)




(पार्टी क्र. १)
(संजय काशीनाथ ...)

साक्षीदार —
(... ... भोसले)

BEFORE ME
V. N. DESHPANDE
३०/११/९७
NOTARY, MAHARASHTRA STATE

100 Rs.

E







विक्री नं. १८४८२ डि. कोर्ट दिनांक १४/९/2002

कि. रु. १००

बेनाराचे नांव अरविंद नारायण कोल्हटकर रा पुणे

हस्ते नांव

Kolhatkar

पुणे न २

**GENERAL POWER OF ATTORNEY**

**TO ALL TO WHOM THESE PRESENT SHALL COME WE, the undersigned**

Arvind Narayan Kolhatkar, Age : 60, Yarkdel Apt., Ganesh Nagar, Eranadwana, Pune

Mrs. Mandakini Sadashiv Bhide, Age : 56, Aditya, Plot No.-2, Shahu Colony, Karve Nagar, Pune.

Mrs. Alpana Anish Sane, Age : 45, Flat No.-4, Swaroop Nagari, Karve Road, Pune-29.

SEND GREETINGS :

WHEREAS, the immovable property situate at Satara at Satara City within municipal limits, out of City Survey No 77, Shukrawar Peth, a plot and dwelling house old structure total area 402 sq. meters, is possessed by us and we are in possession of the said property. we are one of the holders of the said property.

WHEREAS, We are permanent residence at Pune and due to our some domestic difficulties, We are unable to look after the said property. Therefore, We hereby appoint, nominate **Mr. Sanjay Narayan Kolhatkar,** age 50 years, Occupation - Business Residing at 77 Shukrawar Peth, Satara. At/post and District - Satara, as my Lawful Attorney by virtue of this to perform and to do all the following acts, deeds, matters and thing in Our name and on our behalf.

(1) To get measured the said property, plot of a land by applying to the concerned authorities or by a private measurer, to deposit the necessary amounts to the concerned authority. To remain present and sign all the documents in the office of D.I.L.R. and at the time of measurements.

(2) To commence prosecute or to defend, answer or oppose all actions for other legal proceedings in relation to the said property, to declare, to affirm all plaints, written statements, applications, petitions and affidavits and to appear before any Judge, Magistrate, Revenue, Tenancy and other Officers, empowered by law to hear any proceedings, to appoint any Advocate to deposit money and take back the money, to file documents and to receive them back, to settle, adjust compromise, submit for arbitration, abandon all claims, demands disputes and other matters in relation to the said property.

(3) To represent us before all Government, Municipal Local authority or any other authority or authorities, to sign necessary documents, applications, give statements and to do the necessary acts, deeds and things in relation to the said property.

(4) From time to time if and when the said attorney may think fit to surrender, give-up mortgage charge, pledge or lease the abovementioned property to transfer, release or otherwise deal with the said property, to execute, sign, enter into, acknowledge, perfect and to do all such conveyance, lease, mortgages, transfers, surrenders, release; agreements, deeds, instruments as shall be requisite or as the said Attorney may deed necessary or proper.

(5) To sign, execute, present for registration, admit execution of, register, or otherwise perfect any agreement, lease, conveyance, re-conveyance, assignment, surrender, re-assignment any transaction in relation to the above mentioned property.

(6) To substitute and appoint from time to time one or more attorneys or attorney under him with same or limited powers and sub substitute or substitutes, at pleasure, to remove and another or other to appoint.

AND GENERALLY TO ACT AS OUR ATTORNEY OR AGENT in relation to the abovementioned property and to do all necessary instruments, acts, deeds, matters and things as fully or effectually in all respects as We ourself could do if personally present.

AND we hereby for heirs, executors, our administrators and ourself ratify and confirm and agree to ratify and confirm what so ever our said Attorney or any substitute or substitutes acting under him shall do or purport to do by virtue of these presents.

IN WITNESS WHEREOF We have set my hands, this 17th day of January 2002

I know the executents.
Advocate




x [signature]
x Mrs. M. S. Bhide
x [signature]
Executents.




विक्री नं. दि. कोर्ट दिनांक

कि. रु.

घेणाराचे नांव ..........

हस्ते नांव ..........

का. नं. २/१९९७

## :-हमीपत्र-:

लिहून घेणार : १) अरविंद नारायण कोल्हटकर, वय-६०
महाराष्ट्रमित्र, यार्कडेल अपार्टमेंट, गणेशनगर, एरंडवना, पुणे.

२) अच्युत नारायण कोल्हटकर, वय-५८
गोंड मोहल्ला, वॉर्ड क्र. ४, अलापल्ली, ता.जि. गडचिरोली.

३) सौ. मंदाकिनी सदाशिव भिडे, वय-५६
आदित्य आपार्टमेंट, पेन नं. २ शाहू कॉलनी, कर्वेनगर, पुणे.

४) सौ. अनुराधा गोपाळ मराठे, वय-५६
फोंरानासिटी, कॅलिफोर्नीया, अमेरिका.

५) सौ. आल्पना अनिश साने वय-४५
फ्लॅट नं. ४, स्वरुपनगरी, कर्वेरोड, कोथरुड, पुणे-२९.

लिहून देणार :

संजय नारायण कोल्हटकर, वय-५२, राहणार ७७, शुक्रवार पेठ, सातारा.
लिहून देतो की, लिहून घेणार व लिहून देणार यांच्या एकत्रित मालकीचे वडलार्जित घर सातारा येथे ७७, शुक्रवार पेठ, सातारा येथे असून जागेचे क्षेत्र ४०२ चौरस मिटर एवढे आहे.

सदर जागा दि युनायटेड वेस्टर्न बँक, करंजे शाखा यांना लिहून देणार व लिहून घेणार यांचे वडिल नारायण हरि कोल्हटकर यांनी १९९५ साली नारायण हरि कोल्हटकर व लिहून देणार संजय नारायण कोल्हटकर यांच्या महाराष्ट्रमित्र मुद्रणालय या व्यवसायासाठी घेतलेल्या कर्जापोटी तारण दिली आहे. नारायण हरि कोल्हटकर यांचे १/१२/१९९५ रोजी निधन झाल्यानंतर महाराष्ट्रमित्र मुद्रणालय हे भागीदारी संस्थेतून लिहून देणार संजय नारायण कोल्हटकर यांच्या व्यक्तीगत मालकीचे झाले. पुढे पेरशा कामाअभावी लिहून देणार यांचा व्यवसाय बंद पडल्याने आणि लिहून देणार यांचेकडे कर्जफेडीचे अन्य कोणतेही साधन नसल्याने दि युनायटेड वेस्टर्न बँक यांचे कर्ज थकित होऊन बँकेने पुण्याच्या डी.आर.टी. पुढे दावा दाखल केला. सदरचा दावा २२ लाख इतक्या रकमेचा होता. सदर दाव्यात कोर्टापुढे ३.६२ (तिन लाख बासस्ठ हजार) इतक्या रकमेस तडजोड होऊन सदरची रक्कम २८-२-२००२ पूर्वी जमा करावयाची आहे. सदरची रक्कम उभी करण्यास सहकारी बँकेकडून वरील रकमेचे (३.६२) कर्ज घेणे संजय नारायण कोल्हटकर लिहून देणार यांना गरजेचे असून त्याकरता सध्याच्या ७७ शुक्रवार पेठ या एकत्रित मालमत्तेचे तारण देणे आणि त्यावर कर्ज देणाऱ्या बँकेचा बोजा चढवणे गरजेचे आहे. त्यासाठी बँकेस बँकेने दिलेल्या नमुन्याप्रमाणे कायदेशीर पॉवर ऑफ ॲटर्नी लिहून देणार यांच्या नावे लिहून घेणार यांनी देणे गरजेचे आहे.

सदर पॉवर ऑफ ॲटर्नीचा वापर बँकेकडून कर्ज घेण्यासाठी मॉर्गेज पेपरवर सह्या करण्याखेरीज अन्य कोणत्याही कामासाठी लिहून देणार हे करणार नाही. जागेचा कोणताही भाग अगर जागा लिजने, विकत, अगर तबदील करणार नाहीत. त्याचप्रमाणे या कर्ज फेडीनंतर या जागेवर अन्य कोणताही बोजा चढवणार नाहीत अगर तारणावर कर्ज काढणार नाहीत हे हमीपत्र लिहून देणार यांनी स्वखुशीने लिहून दिले आहे.

त्याचप्रमाणे व्यवसायीक अडचण निवारण करण्यासाठी डिसेंबर १९९८ मधे लिहून देणार यांचेपैकी क्र. १, ३ व ५ यांनी रु. १,५५,०००/- (एक लाख पंचावन्न हजार रुपये रोख स्वरुपात दिले आहेत. त्याचप्रमाणे त्यपूर्वीही अरविंद नारायण कोल्हटकर यांनी १९९४ साली लिहून देणार यांनी रु. २५,०००/- (पंचवीस हजार) रोख दिले आहेत. असे मिळून क्र. १, ३ व ५ यांनी रु. १,८०,०००/- (एक लाख ऐंशी हजार रुपये) आजवर दिले आहेत. सदरची रक्कम लिहून देणार हे ३१ डिसेंबर २००४ सालापूर्वी लिहून घेणार क्र. ३ यांचेकडे (सौ. मंदाकिनी सदाशिव भिडे) यांचेकडे सुपुर्द करतील असे लिहून दिले.

स्थळ : सातारा

दिनांक : १२-१-२००२

लिहून देणार

संजय नारायण कोल्हटकर

(A. N. KOLHATKAR)

Mrs. M. S. Bhide